**अॅड.श्री.सुनिल डी. गोन्साल्वेझ, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**
**आर्थिक गुन्हे विभाग,मुंबई येथील गु.र. क्र.८९/२०१३ या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या खटल्यामध्ये मा.विशेष सत्र न्यायालय,मुंबई व मा.एम.पी.आय.डी. न्यायालय,मुंबई येथील न्यायालयीन कामकाज पाहण्यासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-२०१३/प्र.क्र.३८७/पोल-१०**
२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३० नोव्हेंबर, २०१८

**संदर्भ:-** शासन अधिसुचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-१०१६/यु.ओ.आर.६४/डी-१४, दिनांक ०८/१०/२०१८.

**शासन निर्णय:-**

आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई येथील गु.र.क्र.८९/२०१३ या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या प्रकरणात मा.विशेष सत्र न्यायालय,मुंबई व मा.एम.पी.आय.डी. न्यायालय, मुंबई येथे शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी अॅड.श्री.सुनिल डी.गोन्साल्वेझ, विशेष सरकारी अभियोक्ता यांची विधि व न्याय विभागाने उपरोक्त दि.०८/१०/२०१८ च्या अधिसुचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती केली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी अॅड.श्री.सुनिल डी.गोन्साल्वेझ, विशेष सरकारी अभियोक्ता यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| अ) | उपस्थिती/अपरिणामकारक सुनावणी फी | - | ₹ ५,०००/- |
| ब) | परिणामकारक सुनावणी फी | - | ₹ १०,०००/- |

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी अॅड.श्री.सुनिल डी.गोन्साल्वेझ, विशेष सरकारी

अभियोक्ता यांना अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च विभागाच्या मागणी क्र.-१ बी, "२०५५-पोलीस, (००)(१०८)-राज्य मुख्यालय पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (२०५५ ००९७), २८- व्यावसायिक सेवा", या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१७/१८/व्यय-७, दि.२९/१०/२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१८११३०१५४४१५५८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.11.30 15:50:38 +05'30'

**( किशोर शामराव भालेराव )**
उप सचिव (विधि), गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

आपणांस विनंती करण्यात येते की, प्रस्तुत प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त ॲड.श्री.सुनिल डी.गोन्साल्वेझ यांना अंतिमत: अदा करण्यात आलेल्या फी ची एकूण रक्कमेची सविस्तर तपशिलवार माहिती शासनास उपलब्ध करुन द्यावी.

२. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई.

३. सहाय्यक पोलीस आयुक्त आणि मुख्य तपासी अधिकारी (SIT-NSEL), आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई, पोलीस आयुक्त कार्यालय,बृहन्मुंबई.

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१/२,महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर

५. अधिदान व लेखाअधिकारी,मुंबई.

६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.

७. उप सचिव (पोल ११),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.

९. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.

१०. ॲड.श्री.सुनिल डी.गोन्साल्वेझ,एच.नं.१५५/१५६, ख्रिस्तीयन विलेज वार्ड, ओल्ड कुर्ला (प), मुंबई-४०० ०७०.

११. निवडनस्ती (पोल-१०).